**राष्ट्रीय हत्तीरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत २७३ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हनिका-२०१७/ अपदे /प्र.क्र.११६/आ-५**
गो. ते. रुग्णालय आवार, संकुल इमारत,
८ वा व १० वा मजला, मुंबई - ४०० ००१.
तारीख: २० एप्रिल, २०१७.

**संदर्भ :-**

1. **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः पदआ २००७/ प्र.क्र.११७/सेवा-१, दि.६/८/२००७.**
2. **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः हनिका-२०१६/अपदे /प्र.क्र.३९६/ आ-५ दि.१९ ऑक्टोबर, २०१६.**
3. **सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो), पुणे यांचे पत्र क्र. ससंआसे/किजरो/ २७३ हत्तीरोग/अपदे/आस्था ४/न.क्र.१६९/६४०७-०८/१७, दि.४/३/२०१७.**
4. **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/किजरो/राष्ट्रीयहत्तीरोगनिका/२७१ अस्थायीपदे/मान्यता/प्रस्ताव/कक्ष-१८/४८९-९०/२०१७, दि.३०/३/२०१७**

**शासन निर्णय:**

हत्तीरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो), पुणे येथे कार्यरत असलेली खाली नमूद केलेली २७३ अस्थायी पदे दिनांक १/१०/२०१६ ते २८/२/२०१७ पर्यंत वरील अनु. क्र. २ येथील शासन निर्णयान्वये पुढे चालू ठेवण्यात आली होती. सदर पदे राज्यातील जनतेस आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने आवश्यक असल्याने, या पदांना दिनांक १/३/२०१७ ते ३०/९/२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. या पदांचा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१७-२०१८ साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर-१
२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६-सार्वजनिक आरोग्य
१०१-रोग प्रतिबंध व नियंत्रण

(०१) (०२) - हत्तीरोग नियंत्रण कार्यक्रम
(०२) सांकेतांक (२२१० ०५८५)

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १० फेब्रुवारी, २०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४१८१२२४५३०७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: CN = Sanjay R More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.04.29 11:17:20 +05'30'

( सं. रा. मोरे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो), पुणे.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे (सर्व).
५. हत्तीरोग अधिकारी, हत्तीरोग नियंत्रण पथके (सर्व).
६. हत्तीरोग अधिकारी, हत्तीरोग सर्वेक्षण पथके (सर्व).
७. वैद्यकीय अधिकारी, हत्तीरोग संशोधन व प्रशिक्षण केंद्र, नागपूर.
८. आरोग्य अधिकारी, ठाणे/नागपूर महानगरपालिका.
९. महालेखापाल-१/२, महाराष्ट्र (लेखापरिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/निवासी लेखाधिकारी, मुंबई.
१२. वित्त विभाग (व्यय-१३) (अर्थसंकल्प-१९) मंत्रालय, मुंबई.
१३. सार्वजनिक आरोग्य विभाग, (सेवा १,२,३,५ व अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती.